**स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड येथील** Central Instrumentation Centre for Multidisciplinary Research and Innovation **या केंद्राकरीता विविध उपकरणे खरेदी करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एसआरटी-२०२२/प्र.क्र.१७/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३.

वाचा :- १. कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचे दि.०६.०१.२०२२ रोजीचे पत्र.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
३. शासन निर्णय, वित्त विभाग विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२ दि.१७.०४.२०१५.
४. विभागाचा समक्रमांकाचा दि.१९.०९.२०२२ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाची स्थापना ही १७ सप्टेंबर, १९९४ रोजी करण्यात आली आहे. विद्यापीठाच्या परिसरामध्ये १४ संकुले, उप-परिसर, लातूर येथे ४ संकुले आणि परभणी येथे उप-परिसर आहे तसेच विद्यापीठाशी संलग्नित ३५७ महाविद्यालये आहेत. या विद्यापीठाच्या परिसरात, उपपरिसरे व संलग्नित महाविद्यालयांमध्ये संशोधनासाठी अत्यावश्यक सुविधा पुरेशा प्रमाणात उपलब्ध नसल्यामुळे संशोधन विद्यार्थी व प्राध्यापकांना अडचणी निर्माण होतात. आंतरविद्याशाखीय संशोधनासाठी प्रेरणा मिळावी याकरीता स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठात Central Instrumentation Centre for Multidisciplinary Research and Innovation स्थापन करण्याचे नियोजन असुन या केंद्राकरीता विविध अत्याधुनिक उपकरण्याकरीता संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदरहु प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील दि.१९.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये या केंद्राकरीता विविध उपकरणे खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या केंद्राकरीता निधी उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने पुरवणी मागणीद्वारे निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. अर्थसंकल्पित केलेला निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागाने या केंद्राकरीता निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता दिली आहे. सदरहू मान्यतेच्या अनुषंगाने Central Instrumentation Centre for Multidisciplinary Research and Innovation या केंद्राकरीता विविध उपकरणे खरेदी करण्याकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाकरिता २२०२ ३५४८, ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी रु.४,०९,९६,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी नऊ लक्ष शहाण्णव हजार फक्त) एवढा निधी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या विद्यापीठाच्या Central Instrumentation Centre for Multidisciplinary Research and Innovation च्या उपकरणे खरेदी करण्यासाठी वितरीत करण्यास खालील अटीं व शर्तीच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

१) सदर उपकरणे व सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर प्रक्रिया शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करण्यात यावी.

२) सदरहू उपकरणे व सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्यावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकराराची पडताळणी करुन खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post-dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management),मेन्टेनन्स योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) ताळमेळ प्रमाणपत्र (Reconciliation Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी सादर करावे.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) सदरहू खरेदी प्रक्रिया राबवितांना वरील अटीं व शर्तीचे तंतोतंत पालन करण्याची सर्वस्वी जबाबदारी स्वामी रामानंतद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांची राहील.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद तातडीने स्वामी रामानंतद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२

नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (१९) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचा विकास (कार्यक्रम) (२२०२ ३५४८) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०२२११३३२३२८१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.02.21 13:36:29 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
४) कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
५) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती).
६) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
७) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /नांदेड.
१२) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.